जिल्हा नियोजन समिती, लातूरसाठी
**"कार्यकारी समिती" घटित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डिएपी-२०१८/प्र.क्र.१४४ /का.१४८१-अ,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १५ जानेवारी, २०१९

**पहा:-** १) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम, १९९८
२) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) (सुधारणा) अधिनियम, २०००
३) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम,२०१८
४) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, लातूर, यांचे पत्र क्र.जिनिस/कास/नियुक्ती/का-२/२०१८-१९/२५६३,दि. १५/१२/२०१८

**शासन निर्णय :-**

"महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम, १९९८ च्या कलम १२ च्या तरतूदी अनुसार जिल्हा नियोजन समितीला सहाय्य करण्यासाठी, जिल्हा नियोजन समितीच्या अध्यक्षांच्या अध्यक्षतेखाली एक "कार्यकारी समिती" घटीत करण्याबाबतची तरतूद महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम, २०१८ च्या "नियम ६-अ" मध्ये करण्यात आली आहे. त्यानुसार उपरोक्त नमूद कार्यकारी समितीमधे उक्त अधिनियमाच्या कलम ३(३) च्या परिच्छेद दोन (ब) अन्वये एकूण "नामनिर्देशित सदस्य" यांचेपैकी २ "नामनिर्देशित सदस्य" आणि कलम ३ (३) च्या परिच्छेद चार (अ) व (फ) नुसार एकूण "विशेष निमंत्रित "सदस्य यांचेपैकी २ "विशेष निमंत्रित" सदस्यांची नियुक्ती होणे आवश्यक आहे.

२. "महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम, २०१८" मधील "नियम ६-अ" च्या तरतुदीनुसार व महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम,१९९८ च्या कलम ३ (३)च्या परिच्छेद दोन (ब) अन्वये एकूण "नामनिर्देशित सदस्य" आणि कलम ३ (३) च्या परिच्छेद चार (अ) ) नुसार एकूण "विशेष निमंत्रित " सदस्य यांचेपैकी जिल्हा नियोजन समिती लातूरचे अध्यक्ष तथा पालकमंत्री यांनी शिफारस केल्यानूसार लातूर जिल्हयातील खालील सन्माननीय खासदार व आमदार यांच्या नामनिर्देशनासह जिल्हा नियोजन समिती लातूरची "कार्यकारी समिती" खालीलप्रमाणे घटित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नांव | पदनाम |
|---|---|---|
| १. | मा. पालकमंत्री, लातूर | अध्यक्ष |
| २. | श्री. भारत चामे, अहमदपूर, ता.अहमदपूर, जि. लातूर | नामनिर्देशित सदस्य |
| ३. | श्री.भैरवनाथ ठोंबरे, रांजणी,ता.कळंब,जि.उस्मानाबाद (नामनिर्देशित सदस्य,मराठवाडा विकास मंडळ, औरंगाबाद ) | नामनिर्देशित सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४. | डॉ. श्री.सुनील बळीराम गायकवाड, संसद सदस्य | विशेष निमंत्रित सदस्य |
| ५. | डॉ. श्री. सुधाकर संग्राम भालेराव, विधानसभा सदस्य | विशेष निमंत्रित सदस्य |
| ६. | विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग | सदस्य |
| ७. | जिल्हाधिकारी, लातूर | सदस्य |
| ८. | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर | सदस्य |
| ९. | जिल्हा नियोजन अधिकारी, लातूर | संयोजक |

३. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, लातूर यांनी उपरोक्त आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०११५१७२४२०६२१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2019.01.15 17:29:05 +05'30'

**( वि.फ.वसावे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
४. मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव
५. मा. पालक मंत्री तथा अध्यक्ष, जिल्हा नियोजन समिती, लातूर यांचे खाजगी सचिव
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
७. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग
८. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, लातूर
९. उपआयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, औरंगाबाद विभाग
१०. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, लातूर
११. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी , लातूर
१३. निवडनस्ती, का-१४८१अ.